पाटबंधारे प्रकल्पांच्या नियमित देखभाल व दुरुस्ती कामांबाबत सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : देवदु-२०२२/प्र.क्र.३२०/२२/सिंव्य (कामे)**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : १८/०७/२०२४

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्र.देवदु-२०२२/प्र.क्र.३२०/२२/सिं.व्य.(कामे),दि.२३/०२/२०२४

२) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र क्र.मकृखोविम-३७/(१४३/२०२४)/उअ-३/२८८२/२०२४, दि.२६/०४/२०२४

३) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.३१११/विपाविम/कातां-९(१)/बि.सिं.प्रा.सु.धा.क्र.२३/२०२३/२०२४, दि.०८/०५/२०२४.

४) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.कोंपाविम/संकीर्ण/तां-७/वि.सु.वा.आ./१५९३/सन २०२४, दि.०७/०५/२०२४

**प्रस्तावना :-**

पाटबंधारे प्रकल्पांच्या नियमित देखभाल व दुरूस्ती कामांबाबत सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयामध्ये अंशत: सुधारणा करणेबाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे व विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे कडून अनुक्रमे संदर्भ क्र.२ व ३ अन्वये शासनास प्राप्त आहेत. त्यानुसार संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामधील क (१) मध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

| शासन निर्णय दि.२३/०२/२०२४ मधील तरतूद | सुधारणा |
|---|---|
| **(क)१)** कार्यकारी संचालक यांनी **मागील तीन वर्षामध्ये प्रत्यक्ष वसुल झालेल्या बिगर सिंचन पाणीपट्टीच्या सरासरी रकमेतून** थेट उपलब्ध होणारी ४० % रक्कम व उर्वरीत ६० % रक्कम राज्यस्तरीय सिंचन कोषामध्ये जमा केल्यानंतर निर्मित सिंचन क्षमतेच्या प्रमाणात उपलब्ध होणारी रक्कम यांची **मागील तीन वर्षातील सरासरी रक्कम विचारात घ्यावी** व त्यातून २५% | **(क) १)** कार्यकारी संचालक यांनी, **मागील वित्तीय वर्षामध्ये** प्रत्यक्ष वसुल झालेल्या बिगर सिंचन पाणीपट्टीमधून उपलब्ध होणारी ४० % रक्कम व उर्वरीत ६० % रक्कम राज्यस्तरीय सिंचन कोषामध्ये जमा केल्यानंतर निर्मित सिंचन क्षमतेच्या प्रमाणात उपलब्ध होणारी रक्कम विचारात घ्यावी व त्यातून २५% आस्थापना खर्चाचा परतावा,उपसा सिंचन |

| | |
|---|---|
| आस्थापना खर्चाचा परतावा,उपसा सिंचन योजनांची वीज देयके,पाणी वापर संस्थांना दयावयाचा परतावा व संभाव्य आकस्मिक खर्च वगळून येणा-या निव्वळ रकमेच्या मर्यादेत मंडळनिहाय संभाव्य निधी निश्चित करून मुख्य अभियंता व संबंधित अधीक्षक अभियंता यांना शक्यतो, दि.१५ एप्रिल पुर्वी कळवावा. | योजनांची वीज देयके व संभाव्य आकस्मिक खर्च वगळून येणा-या निव्वळ रकमेच्या मर्यादेत मंडळनिहाय संभाव्य निधी निश्चित करून मुख्य अभियंता व संबंधित अधीक्षक अभियंता यांना दि.१५ मे पुर्वी कळवावा. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२४०७१८१६००५७०६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

UMAKANT BAJIRAO BHUJBAL

Digitally signed by UMAKANT BAJIRAO BHUJBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=dbb6f363497706ac5ddc51483d31612506ff44d270248346b728bdb94a712573, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=18653D05C68C7519233E330AFE8BE76626E40A1853033A5A99CF1F69975186FC, cn=UMAKANT BAJIRAO BHUJBAL
Date: 2024.07.18 16:12:36 +05'30'

**( उ. बा. भुजबळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त ) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा. सभापती/उपसभापती, विधान परिषद,विधानभवन,मुंबई
४) मा.अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५) मा.विरोधी पक्ष, विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई
६) अप्पर मुख्य सचिव, वित्त व नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अप्पर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव ( लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) महासंचालक, मेरी नाशिक,
११) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
१२) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१३) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१४) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
१५) सर्व तांत्रिक कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६) निवडनस्ती.